खाजगीकरणाव्दारा सीमा तपासणी नाक्यांचे आधुनिकीकरण करणे, संगणकीकृत तपासणी यंत्रणा कार्यान्वित करणे आणि इलेक्ट्रॉनिक वजन काटे बसविणे.

महाराष्ट्र शासन,
गृह विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२,
शासन निर्णय, क्र. एमव्हीडी.१२०१/सीआर.१४९/परि.४.दिनांक : १४ जून २००१.

प्रस्तावना :-

गोवा, कर्नाटक, आंध्र, मध्य प्रदेश व गुजरात या राज्यांच्या सीमांवर महाराष्ट्र राज्यामध्ये हया १६ सीमा तपासणी नाके निर्माण करण्यात आली आहेत. या विभागाचे मोटार वाहन निरीक्षक व सहाय्यक मोटार वाहन निरीक्षक सदर तपासणी नाक्यांवर २४ तास कार्यरत राहून तपासणीचे कर्तव्य बजावीत असतात. सीमा तपासणी नाक्यावरुन येणा-या साधारणत: प्रत्येक परिवहन वाहनाची तपासणी होते. या तपासणीत वाहनाच्या कागदपत्रांची तसेच वाहनांची प्रत्यक्ष तपासणी करण्यात येते. महाराष्ट्र राज्यास देय असणा-या मोटार वाहन कराची वसुली करण्यात येते. तसेच जर मोटार वाहन कायदा व त्या खालील अधिनियमातील तरतुदींचे उल्लंघन झालेले आढळल्यास अशा प्रकरणात लागू असणारा दंड या विभागाच्या कार्यकारी अधिका-यांमार्फत तडजोड शुल्क स्वरुपात वसूल केला जातो. तथापि, असे निदर्शनास आले आहे की, तपासणीच्या पध्दतीमध्ये व नाक्याच्या कार्यप्रणालीमध्ये काही मूलभूत दोष आहेत. त्यांचे सर्वसाधारण स्वरुप खाली दर्शविल्याप्रमाणे आहे :-

(१) सीमा तपासणी नाके त्यांच्या नियंत्रक अधिका-यांच्या कार्यालयापासून दूर अंतरावर स्थित असल्याने त्यांच्या कामकाजावर नियंत्रण ठेवणे अवघड होते.

(२) सीमा तपासणी नाक्यावरील कर्मचारी वर्ग मर्यादित असल्याने सर्वच वाहतुकदारांच्या वाहनांची तपासणी करणे अशक्य होते,

२/-

(३) मोटार वाहन कायदयातील कलम १९४ अन्वये जर वाहनातून क्षमतेपेक्षा जास्त भार वाहून नेला जात असेल तर सद्या अशा प्रत्येक टनास रु. ४५००/- या दराने तडजोड शुल्क विहित करण्यात आले आहे. या जाचक दरामुळे वाहतुकदारांमध्ये ते बुडविण्याची प्रवृत्ती जास्त दिसून येते.

(४) या सर्वांचा परिणाम म्हणून तपासणी नाक्यांवर प्रत्यक्ष वसुली कमी होते. तसेच तपासणीसाठी वाहने थांबविल्याने तेथे वाहनांची कोंडी होते व तपासणी दरम्यान होत असलेल्या त्रासाबाबत तक्रारी करण्यात येतात.

शासन निर्णय :-

राज्यातील सीमा तपासणी नाक्यांवर मोटार वाहनांची योग्य प्रकारे व जलद तपासणी होण्याच्यादृष्टीने तसेच राज्याला या मोटार वाहनापासून नियमानुसार योग्य महसूल मिळण्याकरिता राज्यातील एकूण १६ सीमा तपासणी नाक्यांचे खाजगीकरणाच्या माध्यमातून आधुनिकीकरण करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे. आधुनिकीकरणाअंतर्गत या सीमा तपासणी नाक्यांमध्ये संगणकीकृत तपासणी यंत्रणा कार्यान्वित करण्यात येईल आणि इलेक्ट्रॉनिक वजन काटे बसविण्यात येतील. ही योजना खाजगीकरणाव्दारे BOOT या तत्वावर खाजगी कंत्राटदारामार्फत राबविण्यास शासनाची मंजुरी देण्यात येत आहे. तसेच याच शासन निर्णयान्वये या योजनेस प्रशासकीय मंजुरी देण्यात येत आहे .

या १६ सीमा तपासणी नाक्यांपैकी पहिल्या टप्प्यात आच्छाड (ठाणे), पळसनेर (धुळे), नवापूर (नंदूरबार), कागल (कोल्हापूर), उमरगा (उस्मानाबाद), देवरी (भंडारा), इन्सुली (सिंधुदुर्ग) व मंद्रुप (सोलापूर) अशा ८ सीमा तपासणी नाक्यांचे आधुनिकीकरण करण्यात येईल व उर्वरित पिंपळखुटी (यवतमाळ), मानेगांव (गोंदिया), पूर्नाड (जळगांव), वरुड (अमरावती), खरपी (अमरावती ), चोरवड (जळगांव), बोरगांव (नाशिक) व राजूर (चंद्रपूर) या ८ सीमा तपासणी नाक्यांचे आधुनिकीकरण हे दुस-या टप्प्यात करण्यात येईल.

GR-20020125123644000-

२/-

२. सीमा तपासणी नाक्याच्या आधुनिकीकरणाची ही योजना खाजगी कंत्राटदारामार्फत **BOOT** या तत्वावर अंमलात आणावयाची असून या योजनेचे स्वरुप खालीलप्रमाणे राहील :-

(१) कंत्राटदाराने पुढीलप्रमाणे सुविधा पुरवाव्या लागतील :-

१) तपासणी नाक्यांकडे येणारे खास रस्ते व मार्गिका तयार करणे,
२) शासनास देय असणारी कर, दंड अथवा इतर रक्कम वसूल करण्यासाठी विशेष कक्ष तयार करणे,
३) इलेक्ट्रॉनिक्स वजन काटे बसविणे व ते चालू करणे,
४) संगणक बसविणे व कार्यान्वित करणे व ते तपासणी नाक्यांशी जोडणे. तपासणी नाक्यांवर प्राप्त होणा-या माहितीचे पृथ:करण करणे,
५) याबाबतचे सॉफ्ट वेअर विकसित करणे व बसविणे. संगणक व्यवस्था परस्पर पूरक असण्यासाठी कंत्राटदाराना Universal Data Structure (U.D.S.) पुरविण्यात येईल,
६) फी, कर व दंड वसुलीसाठी मनुष्यबळ व इतर बाबींची तरतूद करणे,
७) भविष्यात संगणकीकृत व्यवस्था परस्पराशी व्यवस्थितरित्या जोडलेली असेल हे पाहणे,
८) अंमलबजावणीच्यादृष्टीने वाहन, दूरध्वनी तसेच वायरलेस सेट्स इ. बाबींची तरतूद करणे,
९) आपत्कालिन वैद्यकीय सुविधांची व्यवस्था करणे,
१०) विश्रांती व करमणुकीच्या साधनांची व्यवस्था करणे,
११) इतर अनुषंगिक बाबी जसे विमा उतरविणे इ. बाबींची तरतूद करणे.

(२) संबंधित सीमा तपासणी नाक्यावर जमा होणा-या दंडाच्या / कराच्या रकमेतून काही रक्कम निविदेतील अटी व शर्तीनुसार कंत्राटदारास आधुनिकीकरणासाठी त्यांनी केलेल्या गुंतवणुकीसाठी मासिक तत्वावर देण्यात येईल.

(३) फी वसूल करणे व वाहनांची तपासणी या बाबी पूर्वीप्रमाणेच मोटार वाहन विभागाच्या अधिकारी / कर्मचा-यांमार्फत करण्यात येतील.

(४) याकरिता प्रत्येक नाक्याकरिता कंत्राटदारास स्वतंत्र निविदा भरावी लागेल.

GR - 20020125123644000-0200

3/-

(५) निविदाची बोली करणा-याने प्रकल्पाचा संपूर्ण खर्च भागविणे अपेक्षित आहे. त्याच्या दायित्वाविषयी अथवा कर्जाविषयी शासनातर्फे कोणतीही हमी दिली जाणार नाही. बोलीदाराने बँक अथवा इतर संस्थेमधून आर्थिक मदतीसाठी करार केल्यास शासन त्यास कोणत्याही प्रकारे हमीदार राहणार नाही. तसेच तपासणी नाक्यावर निर्माण करण्यात आलेल्या सुविधा कोणत्याही प्रकारे कर्जफेडीसाठी हमी म्हणून उपलब्ध राहणार नाहीत. तसेच त्या गहाण ठेवण्यास शासन परवानगी देणार नाही. शासनातर्फे कोणत्याही परिस्थितीत कोणतेही कमीत कमी काम देण्याची हमी घेतली जाणार नाही. तसेच प्रत्यक्ष अथवा अप्रत्यक्षरित्या कंत्राटदाराचे नुकसान झाल्यास त्यास संरक्षण देणार नाही. BOOT बाबत टोल टॅक्स करता असणा-या इतर अटी व शर्ती जशाच्या तशा इथेही लागू होतील.

(६) निविदांची संपूर्ण कागदपत्रे आणि निविदा कराराच्या अटी निश्चित करण्यासाठी एक समिती गठित करण्यात यईल. निविदा पृथ:करणासाठी दुसरी समिती गठित करण्यात येईल. प्राप्त झालेल्या बोलीचे पृथ:करण करण्याचे व कंत्राट देण्यासाठी योग्य बोलीचे शिफारस करण्याचे काम ही समिती पाहील. या समितीच्या शिफारशीवर आधारित निर्णय घेऊन शासनातर्फे कामाचे कंत्राट देण्यात येईल व त्याची संपूर्ण अंमलबजावणी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, यांचे देखरेखी व नियंत्रणाखाली राहील. या दोन्ही समित्या परिवहन आयुक्तांकडून नियुक्त केल्या जातील.

(७) कंत्राटदारास अदा करावयाच्या रकमेची पध्दत ठरविण्यासाठी एक समिती गठित करण्यत येईल. यात वित्त विभाग व परिवहन आयुक्त यांचा १ / १ प्रतिनिधी राहील. रक्कम अदा करण्याची पध्दत अशीच असेल जेणेकरुन परिवहन आयुक्त कार्यालयास कंत्राटदारास सरळ चेकव्दारे ही रक्कम देता येईल.

(८) या योजनेची अंमलबजावणी करतांना काही अडचणी आल्यास त्याचे निराकरण करण्यासाठी मा. मंत्री (परिवहन) अध्यक्ष असलेल्या व प्रधान सचिव (परिवहन) , प्रधान सचिव (वित्त), सचिव (रस्ते) व परिवहन आयुक्त हे सदस्य असलेल्या समितीने निर्णय घ्यावा.

(९) याच नाक्यांतून सेल्स टॅक्स व एक्साईज विभागाची कामेही करण्यात यावी.

GR-2002025

४/-

३. परिवहन आयुक्त, मुंबई यांनी या योजनेच्या अंमलबजावणीच्या संदर्भात पहिल्या टप्प्यात आधुनिकीकरण करावयाच्या ८ सीमा तपासणी नाक्यांच्यासंदर्भात निविदा मागविण्याबाबतची आवश्यक ती कार्यवाही तातडीने करावी .

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ४२५/२००१/व्यय.८, दिनांक ११ मे २००१ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नांवाने,

डॉ. सुरेश जोशी
महाराष्ट्र शासनाचे प्रधान सचिव .

प्रति,

परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-१, मुंबई ,
महालेखापाल, महाराष्ट्र राज्य-२, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
सर्व प्रादेशिक परिवहन अधिकारी,
सर्व उप प्रादेशिक परिवहन अधिकारी,
सार्वजनिक बांधकाम विभाग,मंत्रालय, मुंबई,
विधी व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई .
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई ,